श्री.

सचित्र

# गौळण मेळा.

पद १ लें.

देखिला मी श्रीहरी ॥ विश्व व्यापक मुरारी ॥ धृ० ॥
आणि सोनियाचा दिन ॥ वर्षे अमृताचे घन ॥ १ ॥
बरवा संत समागम ॥ प्रगटला आत्माराम ॥ २ ॥
बाप रखुमा देवीवर ॥ कृपासिंधू करुणाकर ॥ ३ ॥

पद २

अरे कृष्णा अरे कान्हा मनरंजन मोहना ॥ धृ० ॥ आले संत घरीं तरी काय बोलून शिणवावें ॥ उंस गोड झाला ह्मणून काय मुळासहित खावा ॥ प्रीतीचा पाहुणा झाला ह्मणून काय फार दिवस राहावा ॥ गांवचा पाटिल झाला ह्मणून काय गांवच बुडवावा ॥ अ० ॥ १ ॥ देव अंगीं आला ह्मणून काय भलतेंच बोलावें ॥ चंदन शीतळ झाला ह्मणून काय उगाळून प्यावा ॥ वडील रागें भरला ह्मणून काय जिवेंच मारावा ॥ भगवीं वस्त्रें केलीं ह्मणून काय जगच नाडावें ॥ अरे० ॥ २ ॥ आग्या विंचू झाला ह्मणून काय कंठींच कवळावा ॥ फुकाचा हत्ती झाला ह्मणून काय भलत्यांनीं

न्यावा ॥ फुकट हिरा झाला ह्मणून काय कथिलीं जोडावा ॥ नित्य व्याज खातो ह्मणून काय मुद्दल बुडवावें ॥ अरे० ॥ ३ ॥ परस्त्री सुंदर झाली ह्मणून काय बळेंच भोगावी ॥ सोन्याची सुरी झाली ह्मणून काय उरींच मारावी ॥ मखमाली पैजार झाली ह्मणून काय शिरींच वंदावी ॥ अ० ॥ ४ ॥ सद्गुरु सोयरा झाला ह्मणून काय आचार बुडवावा ॥ नित्य देव भेटे तरी काय जगाशी दावावा ॥ घरचा दिवा झाला ह्मणून काय आडणी बांधावा ॥ एका जनार्दनीं ह्मणे हरि हा गुप्तचि ओळखावा ॥ अरे० ॥ ५ ॥

पद ३ रें.

अतसी कुसुमसम कांती हरिची ॥ धृ० ॥ सूक्ष्म तंतूची उंच घोंगडी ॥ पदरीं तगटीं कोर जरीची ॥ अत० ॥ १ ॥ आठवितां ममताची गळाली ॥ सूक्ष्म दोरी दों करींची ॥ अत० ॥ २ ॥ अमृत सदोदित चिंतितसे मनीं ॥ मूर्ती येशोदेचे हृदयींची ॥ अत० ॥ ३ ॥

पद ४ थें.

अग बाई हाच माझ्या घोशाचा दानयान ॥ यानें लुटिल्या चावलाच्या गोनयान गो ॥ गवारी गो ॥ हाच० ॥धृ०॥ यानें अगासुर बगासुर मारल्यान ॥ यानें बळी पाताळीं नेउन घातल्यान ॥ यानें कंसाची गरदन तोरल्यान गो ॥ गवारी

गो ॥ हा० ॥ १ ॥ समुद्रासीनी भाक दिला गोरयान ॥ यानें वळविले गोरयाचे ढोरयान ॥ प्रल्हादासिनी अर्थीत तारल्यान गो ॥ गवारी गो ॥ हाच० ॥ २ ॥ द्रौपदीच्यानीं धांवण्यासी धांवल्यान ॥ बहीण ह्मणून संकटीं तारल्यान ॥ अभिमान्यासी केला त्यानीं मषाव्यान गो ॥ गवारी गो हाच० ॥ ३ ॥ यानें रावण कुंभकरण मारल्यान ॥ यानें राज्यासी बिभिषण थापल्यान ॥ वाल्या कोळ्याशीं गडे यानें तारलान गो ॥ गवारी गो ॥ हाच० ॥४॥ दुबळे ब्राह्मण वस्त्रासी नाडलान ॥ त्याला सोन्याची नगरी धाडलान ॥ मोठे दारिद्रय त्याचें फेडलान गो ॥ गवारी गो ॥ हाच० ॥ ५ ॥ बारा सोळा मिळुनि गौळणी ॥ त्यांनीं वेढिला चक्रपाणी ॥ मच्छनाथ धन्य तुझी वाणी गो ॥ गवारी गो ॥ हाच माझ्या० ॥ ६॥

पद ५ वें.

अनंतलीला रूप सांवळा तो बाळ ब्रह्मचारी पातकें लोळती चरणांवरी ॥ धृ० ॥ ह्मणे येश्वदा बा गोविंदा नको जाऊं परद्वाराला ॥ कीं गवळण मुखरण जपली तुला ॥ होति एक गौळण घरची धनींण ॥ गेली होती बाहेरी ॥ जाऊन चढला माळ्यावरी ॥ वर पाहातो शिंकीं लोंबती हात चालविले चारी ॥ चारी हातांनीं दहिं खाई हरी ॥ खाऊन पिऊन दिले ढेंकर शिंकीं आणिलीं बाहेरीं ॥ १ ॥

टाकिली शेजारणीचे दारीं ॥ होती एक गौळण घरची धनीण पाही आपल्या मंदिरीं ॥ दह्या दुधाच्या फोडल्या हारी ॥ गेला पुसाया तिचेपाशीं शेजारणीचे दारीं ॥ माझीं शिकीं कांगे तुझें द्वारीं ॥ त्या रांडेनें केलें भांडण आली माझे अंगावरी ॥ दांत चावून गाल कुसकरी ॥ २ ॥ स्त्री पुरुष निजलीं होतीं समया लावून चारी ॥ कृष्णदेव गेले पलंगा-सामोरी ॥ दाढी वेणीची गाठ मारिली त्या दोघां सामोरी ॥ आपण मग पळून आला बाहेरी ॥ दचकून उठली वेणी गुंतली झाली गौळण घाबरी ॥ आतां माझी गांठ सोडा लौकरी ॥ त्या दोघांना गांठ सुटेना बोलाविला शेजारी ॥ त्यानें गडे ओढित आणिलीं द्वारीं ॥ अवघे नगरचे लोक मिळाले तमाशा पाहती सारीं ॥ गवळण गरगर गिरक्या मारी ॥ गवळी ह्मणे अगे गौळणी दाढी तुटली सारी ॥ कीं गवळी बरबर दाढी धरी ॥ ॥ ३ ॥ घागर घेऊन गेली पाण्याला यमुनेच्या तिरीं ॥ कीं घागर फोडी डोईवरी ॥ गौळणी ह्मणती येश्वदे माते पाहीं तुझा श्रीहरी ॥ माझे सुनेशीं मारी मंदिरीं ॥ येश्वदा माता झाली जागृत लावुन शुभ्र दोरी ॥ पाळणा हालविते लवकरी रांगत रांगत गेला कंसारी देव होते देव्हारीं ॥ त्यानें गडे देवच गिळिले सारे ॥ तुका ह्मणे आठवावा श्रीहरी ॥ ४ ॥

पद ६ वें.

अधरीं धरुनी वेणु । वेणु वाजविला कोणी नेणूं ॥ धृ०॥
प्रातःकाळीं तो वनमाळी । वना घेऊनी जातो धेनु ॥ १ ॥
उभी मी राहें वाट मी पाहें । केव्हां भेटेल मम कान्हु ॥ २ ॥
एका जनार्दनीं वाजविला वेणु ॥ ऐकतां मन झालें तल्लीनु ॥ ३ ॥

पद ७ वें.

आह्मीं व्रज गोकुळींच्या ॥ गोकुळींच्या नारी ॥ करुनि शृंगार कला कुसरी ॥ भरुन नवनीत ॥ नवनीत घेऊनि शिरीं ॥ हठा जातों मधुरानगरीं ॥ तुझा नट नाटक ॥ नाटक श्रीहरी ॥ दान मागे धरुनि पदरीं ॥ चाल ॥ मस्कऱ्या करितो ॥ कर खोडुनि पदर धरितो ॥ मलमलत्या मस्कऱ्या करितो ॥ तोड ॥ बाई करितो या काळीं ॥ मार्गी बाई करितो गे धुमाळी ॥ यशोदे तुझा ॥ तुझा गे वनमाळी ॥ मार्गी बाई करितो धुमाळी ॥ धृ० ॥ १ ॥ संगे गोपाळ गडी घेतो ॥ उठूनि मध्यरात्रीं येतो ॥ मारें नवनीत ॥ नवनीत गोरस पीतो ॥ शिरीं तवकें लवंडून देतो ॥ चाल ॥ करितो चेष्टा ॥ गोकुळीं करितो चेष्टा ॥ यशोदे तुझा कारटा ॥ आडवितो गौळणी श्रेष्ठा ॥ बाई श्रेष्टा या काळीं ॥ मार्गी बाई० ॥ २ ॥ बळो गे या गोकुळींची ॥ गोकुळींची वस्ती ॥ किती सोसावी

जबरदस्ती ॥ जाऊं दे उलथून ॥ उलथून याची मस्ती ॥ राज्य कंसाची वस्ती ॥ चाल ॥ येथून आह्मीं जाऊं ॥ कंसाची ग मथुरा पाहूं ॥ सुखवस्ती ग तेथं राहूं ॥ तोड ॥ बाई राहूं गे या काळीं ॥ मार्गीं बाई करितो धुमाळी ॥ पेश्वदे तुझा ॥ तुझा गे वनमाळी ॥ मार्गीं बाई० ॥ ३ ॥

पद ८ वें.

आल्या पांच गौळणी पांच रंगांचे शृंगार करूनी ॥ धृ० ॥ पाहेली गौळण रंग सफेत ॥ जशी चंद्राची ज्योत ॥ गगनीं चांदणी लखलखित ऐका तिची मात ॥ मंथन करित होती दारांत ॥ धरून कृष्णाचा हात ॥ ऐशा नटूनी ॥ आल्या पांच० ॥ १ ॥ दुसरी गौळण भाळी भोळी ॥ रंग हळदीहून पिंवळी ॥ पिंवळा पितांबर नेसुन आली ॥ अंगीं बुट्टे-दार चोळी ॥ एक लहान तनु उमर कवळी ॥ जशी चांफ्याची कळी ॥ ऐशा० ॥ २ ॥ तिसरी गौळण रंग काळा ॥ नेसुन चंद्रकळा ॥ काळें काजळ लेउन डोळां ॥ आली राजस बाळा ॥ ऐशा० ॥ ३ ॥ चवथी गौळण रंग लाल ॥ लाड लालडी लाल ॥ कपाळीं कुंकू चिरी लाल लाल ॥ भांगीं भरून गुलाल ॥ मुखीं विडा रंग लाल लाल ॥ जसें डाळिंबीचें फूल ॥ ऐशा० ॥ ४ ॥ पांचवी गौळण हिरवा रंग ॥ अवघ्या झाल्या दंग ॥ हिरव्या कांक-

णाचा पहा रंग ॥ आरशींत जडलें मिग ॥ फुगडी खेळती कृष्णासंग ॥ एगनाथ अभंग ॥ ५ ॥

पद ९ वें.

अजिचा दिन आह्मां झाला आनंदु ॥ सकळिका स्वरूपीं स्वयें दिसे गोविंदु ॥ ॥ १ ॥ पाहिलें गे माय सांगों काय मी कैसें ॥ जथें जेथें पाहे तेथें तेथें गोविंद दिसे ॥ २ ॥ पाहतां पाहणेसी मी हो तटस्त झालें ॥ सबाह्य अंतर पुरुषोत्तमें व्यापिलें ॥ ३ ॥ यापरी पाहतां हर्ष होत आहे मना ॥ धनी न पुरे गातां एक जनार्दना ॥ ४ ॥

पद १० वें.

उद्धव आहे मथुरेसीं ॥ कोणी तरी गे पाठवा ॥ कोणी तरी गे पाठवा गे श्रीहरिला भेटवा ॥ ध्रु० ॥ एक ह्मणती जाउनि सांगा श्रीहरीला विनंती ॥ एक विचार करिती चित्तीं कां रुसले श्रीपती ॥ याच्या मुरलीच्या नादानें मोहिली चित्तवृत्ती ॥ इतराजी आह्मांवरती जाउन पाठवा ॥ उद्धव० ॥ १ ॥ गोकुळांत अनर्थ झाला गोपाळ आणि गाई ॥ गोवत्सें त्यागून फिरती कीं ह्मणती कान्हा नाहीं ॥ ऐशा सकल जनांच्या वृत्ति वेधल्या हरिपायीं ॥ एक ह्मणती शेषशायी हृदयीं आठवा ॥ उद्ध० ॥ २ ॥ गोपींचा ऐकुनी धांवा हरि आले गोकुळांत ॥ आनंदु नर-

नारीसीं न समावे हृदयांत ॥ व्यासांनीं वर्णन केली भागवतीं सुमात ॥ ह्या जीवना मूर्तिच्या माळा प्रेमानें गांठवा ॥ उद्ध० ॥ ३ ॥ एक वृत्तांत मधुसूदनासीं उद्धवें जाणविला ॥ करुणाकर कृष्ण मुरारी मनीं आपले तोषला ॥ शिव शालिग्राम सेवेसी शिव तुळसी कोमल्या दासाला चरणीं ठाव देईगा माधवा ॥ उद्ध० ॥ ४ ॥

पद ११ वें.

ऐक ऐक सखये बाई ॥ नवल मी सांगूं काई ॥ त्रैलोक्याचा धनी तो हा यशोदेसी ह्मणतो आई ॥ देवकीनें वाहिलागे यशोदेनें पाळिला ॥ पांडवांचा बंधुजन होउनियां राहिला ॥ देव० ॥ १ ॥ ब्रह्मांडाची सांठवण योगियांचें निजध्यान ॥ चोरी केली ह्मणोनियां उखळाशी बंधन ॥ दे० ॥ २ ॥ सकळ तीर्थें ज्याचे चरणीं सुलभ हा सुलभपाणी ॥ राधिकेसी ह्मणतो तुझी करितों मी वेणी फणी ॥ दे० ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं कैवल्याचा मोक्षदानी ॥ गाई गोप गोपबाळा भिऊविलीं आपुलेपणीं ॥ दे० ॥ ४ ॥

पद १२ वें.

ऐक यशोदे बाई । तुझ्या हरिला सांग कांहीं । हा पडतो आमुच्या डाहीं ॥ नंदाचे राणी ॥ १ ॥ संचित नवनीत खाई ॥ रांजणें फोडीतो बाई ॥ धरूं ह्मणतां पळून जाई ॥

नंदाचे राणी ॥ २ ॥ सांवळा ग चिमणा माझा ॥ खेळतो ग यादव राजा ॥ तुह्मी मोठ्या ढालगजा ॥ गोकुळींच्या नारी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हो बाई ॥ हरीविण न गमे कांहीं ॥ हरी वांचून करमत नाहीं ॥ नंदाचे राणी ॥ ४ ॥

पद १३ वें.

कशी जाउं मी वृंदावना ॥ मुरली वाजवितो कान्हा ॥ ॥ धृ० ॥ पहिले तिरीं हरी वाजवी मुरली ॥ नदी भरली जमुना ॥ १ ॥ कांसे पितांबर केशरी टिळक ॥ कुंडल शोभे काना ॥ २ ॥ काय करूं बाई कोणाला सांगूं ॥ नामाची सांगड आणा ॥ ३ ॥ नंदाच्या हरीनें कौतुक केलें ॥ जाण अंतरींच्या खुणा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ह्मणा ॥ देवमहात्म्य कळेना कोणा ॥ ५ ॥

पद १४ वें.

कशी मोहनी घातली नंदाचे काना ॥ क० ॥ धृ० ॥ तुझा कान्हा पहा आहे निसंग ॥ मी धरिं त्याचा संग ॥ गोकुळांत उडवितो रंग ॥ सांवळी मूर्ति पाहाना ॥ १ ॥ गौळणी जाति यमुने तिरीं ॥ वाटेमध्यें अडवूनि धरी ॥ रंग भरून मारी पिचकारि ॥ चुंबन घेउन सोडिना ॥ २ ॥ भुलवून आणी गौळ्यांच्या पोरी ॥ यमुनेतिरीं खेळे होरी ॥ धरून करि आमची मस्करी ॥ करितो धिंगाणा ॥ ३ ॥ गौळणी सर्व

एकत्र जमती ॥ यशोदेशीं करिती विनंती ॥ आतां नाही आम्हुची गती ॥ दास लागे चरणांप्रतां ॥ कृशी० ॥ ४ ॥

पद १५ वें.

करितो रळी बहुत सये नंदन तुझा ॥ धृ० ॥ आंवळुनियां मज धरीं चुंबन मग देत हरी ॥ उगा रडे गळां पडे चेंडू दे ह्मणे माझा ॥ क० ॥ १ ॥ बळें घरा येत असे दहीं दुध भक्षितसे ॥ करी हांस बहु त्रास ठाव नसे दुजा ॥ क० ॥ २ ॥ दीर भावे आणि पती गांजितात सांगूं किती ॥ सासु नळा पिळित गळा जिव घेती माझा ॥ ३ ॥ ऐसा असे दुष्ट बाई सोसवेना सांगूं काई ॥ अमृतराय सदा गाई भक्तभजन काजा ॥ क० ॥ ४ ॥

पद १६ वें.

कांरे हरी आम्हुची धरितोसी वाट ॥ धृ० ॥ गौळणी सकळ गोपीबाळा ॥ त्यांनीं त्यजिला हाट ॥ न ह्मणसि लेकी न ह्मणसि सुना कर्म करशी अचाट ॥ २ ॥ एक जनार्दनीं तारि गुणनाम ॥ वेद गर्जती जैसे भाट ॥ ३ ॥

पद १७ वें.

काळी घोंगडी, घोंगडी हातीं काठी ॥ लागलों धेनुच पाठीं ॥ धृ० ॥ अरे हरि व्रज ॥ वांकुडा वांकुडा किं तुजसाठीं ॥ बैसला कीं यमुनेच्या तटीं ॥ काळी० ॥ १ ॥ राधा गोरटी

गोरटी हातीं वाटी । लागली कृष्णाचे पाठी ॥ काळी० ॥ २ ॥ एका जनार्दनीं, जनार्दनीं झाली दाटी ॥ घातली पायांवर मिठी ॥ का० ॥ ३ ॥

पद १८ वें.

कान्होबा निवडीं आपुलीं गोधनें ॥ का० ॥ ध्रु० ॥ पांच पोळ्या तीन भाकरी ॥ दिड कानिवला एक पुरी ॥ आह्मां धाडिलें वैल्या दुरी ॥ आमुची ठकवून खाल्ली शिदोरी ॥ १ ॥ परि ऐसी शारंगधरा ॥ तुझा बैल चुकला मोरा ॥ सांगों गेलों तुझ्या घरा ॥ पाठीं लागला तुझा म्हातारा ॥ २ ॥ परि येसी हृषिकेशी ॥ गाई म्हशीचें दूध पिशी ॥ वांसरें प्याली ह्मणून सांगशी ॥ उद्यां ताक नाहीं आम्हांशीं ॥ का० ॥ ३ ॥ कान्होबा ओढाळ तुझ्या गाई ॥ होत्या नव्हत्या कळंचा टायीं ॥ शिव्या देते तुझी आई ॥ का० ॥ ४ ॥ विष्णुदास नाम साहे ॥ देवा तूंचि बाप माय ॥ अखंड माझे हृदयीं राहे ॥ कान्हो० ॥ ५ ॥

पद १९ वें.

कैसी जाऊं कुंजवनीं आहे श्याम ॥ ध्रु० ॥ गोरस घेउनि मथुरेसी जातां ॥ अडकुनी मागेल दाम ॥ कै० ॥ १ ॥ नवयौवना मी कुलवधु नेटकी ॥ आहे हरि बहुत उद्दाम ॥ कै० ॥ २ ॥ निबिड तरुवरीं बाचनि बसतो ॥ नाहीं तया दुसरें काम

॥ कै० ॥ ३ ॥ जयराम जयसुत अंकित ह्मणे प्रभु ॥ मज दाखविं निजधाम ॥ कै० ॥ ४ ॥

पद २० वें.

कृष्णा मजकडे पाहूं नको माझी घागर गेली फुटून ॥ कृ० ॥ धृ०॥ डोईवर घागर हातामध्यें झारी ॥ वेणीच गेली सुटून ॥ कृ० ॥ १ ॥ भिंती आड चढून आला माझ्या जवळी ॥ न्हाणींत नाहातें जपून ॥ कृ० ॥ २ ॥ श्याम हा सुंदर अति मनोहर ॥ बाहार हा घ्यावा लुटून ॥ हरीचा बाहार हा घ्यावा लुटून ॥ कृ० ॥ ३ ॥ माणिकप्रभु ह्मणे प्रीतीची राधा ॥ हरि चरणीं चाले जपून ॥ कृ० ॥ ४ ॥

पद २१ वें.

कृष्णा धांवरे लोकरी ॥ हरि संकट पडलें भारी ॥ हरि तूं आमुचा कैवारी ॥ आलीं विघ्नें निवारीं ॥ धृ० ॥ पांडव असतां वनवासी ॥ कळलें कौरवांसी ॥ त्यांनीं पाठविले ते ऋषी ॥ सत्व हरावयासी ॥ १ ॥ साठी सहस्र खंड्या अन्न ॥ दुर्वासा भोजन ॥ सत्व जातील घेऊन ॥ अंतर पडतां जाण ॥ कृ० ॥ २ ॥ रात्र झालीसे दोन प्रहर ॥ आले ऋषीश्वर ॥ भोजन मागती सत्वर ॥ कैसा करूं विचार ॥ कृ० ॥ ३ ॥ आज कां निष्ठुर झालासी ॥ कोठें गुंतलासी ॥ माझी होईल बा गत कैसी ॥ अनाथ मी परदेशी ॥ कृ० ॥ ४ ॥

आतां न लावीं उशीर ॥ धर्म चिंतातुर ॥ अनर्थ करील तो फार ॥ येवढा करिं उपकार ॥ कृ० ॥५॥ कंठ शोषला अनंता॥ पदर पसरितें आतां ॥ धांवें पावें गा श्रीनाथा ॥ येईं रुक्मिणीकांता ॥ कृ० ॥ ६ ॥ ऐकुनि बहिणीची करुणा ॥ आला यादवराणा ॥ द्रौपदी लोळतसे हरिचरणा ॥ उद्धव चिद्‌घन जाणा ॥ कृष्णा० ॥ ७ ॥

पद २२ वें.

खरी झाली दृष्ट माझ्या श्रीहरीला वाटतें ॥ दचदचकून लेंकरूं हें तिनतिनदां उठतें ॥ भय भारी जिरेल कैंचा मन फार दाटतें ॥ धीर देसें जिवाला मी मन शांति होईना ॥ रडतो हा हृषिकेशी हरि माझा राहिना ॥ धृ० ॥ १ ॥ रडतो हा पाळ-ण्यांत पे उतरून खालता ॥ जाई सोडीं वांसुराला धरि पुच्छ चालतां ॥ गोपाळांचे संगें बारे तूं होई बोलता ॥ हा मोठा धीट बाई तिळमात्र भिईना ॥ रड० ॥ २ ॥ नको नेऊं राधे हरि दहिं भात भरवुं दे ॥ फुलें तुळसी देवापाशीं हा बाळ खेळुं दे ॥ कानफाड्या आला याचा अंगारा लावूं दे ॥ हा नवसांचा जणूं बाई मला ठाऊक होईना ॥ रड० ॥ ३ ॥ रडतसे गडगडुन धरि टाहो घेतला ॥ उखळा मुसळाला बांधोनी टाकिला ॥ नित्य कळतो समाचार कंसासी नतेला ॥ देव कांहीं अजुन त्यासी बरि बुद्धि देईना ॥ रडतो० ॥ ४ ॥ धन्य येश-

देचें सुंदर हें बालक ॥ भक्तांचा साहाकारी वैकुंठ नायक ॥ दुष्टांचा शत्रु हाचि दीनांचा पालक ॥ महादेव गुण गातो मन शांती होईना ॥ रडतो हा० ॥ ५ ॥

पद २३ वें.

खेळग फुगडी ॥ नको जाऊं तूं रडी ॥ ध्रु० ॥ फुगडी खेळग तूं पिंगा ॥ आलीस माझ्या संगा ॥ फुगडी खेळरे श्रीरंगा ॥ सोडून धांगडधिंगा ॥ १ ॥ फुगडी खेळगे फेराची ॥ हो बाईल दिराची ॥ लज्जा सांडगे मनाची ॥ गांवच्या लोकांची ॥ २ ॥ फुगडी खेळगे लाखोटा ॥ धर माझा आंगठा ॥ बळकट घालगे कांसोटा ॥ सोडून चारी वाटा ॥ १ ॥ फुगडी खेळगे शिवशक्ती ॥ हरिनामाची भक्ती ॥ तुकया स्वानंदें गर्जती ॥ द्रौपदीच्या कीर्ति ॥ ४ ॥

पद २४ वें.

गाई गोपाळ यमुनेच्या तटीं ॥ येती पाणिया मिळून जगजेठी ॥ चेंडू चौगुणा खेळती वाळवंटीं ॥ चला चला ह्मणती पाहूं दृष्टी ॥ ऐशा गोपिका त्या कामातुर नारी ॥ १ ॥ चित्त विव्हळ त्या देखावया हरी ॥ मीस पाणियाचें करिताती घरीं ॥ बारा सोळा मिळुनि परस्परीं ॥ २ ॥ चीर चोळिया त्या धुर्ता विसरती ॥ ऊर्ध्व लक्ष लागलें कृष्ण मूर्ति ॥ कोणा न ठावें कोण कुठें जाती ॥ झाल्या तटस्थ सकळ नेत्रपातीं ॥

॥ ३ ॥ दंत धुवण्याचा मुखामार्जी हात ॥ वाद्य वाजती न एकती जन्मांत ॥ करी श्रवण कृष्णा वेणू नाद गीत ॥ स्वामी तुकयाचा पुरवी मनोरथ ॥ एशा० ॥ ४ ॥

पद २५ वें.

गोधनें चारावया जातो सारंगपाणी ॥ मार्गी भेटली राधिका गौळणी ॥ कृष्ण दान मागे निरी आसडुनी ॥ तंव देखिली येश्वदा जननी ॥ १ ॥ येश्वदा ह्मणे नाटका हृषिकेशी ॥ परनारीसी कैसा धुंडिसी ॥ येरु रुदोनी सांगतो मातेसी ॥ माझा चेंडू लपवी निरीपाशीं ॥ २ ॥ राधिका ह्मणे येश्वदे परियेसी ॥ तुझा बाळ लटका लबाड हृषीकेशी ॥ चेंडू नाहीं मजपाशीं ॥ निरी आसडितां चेंडू पडे धरणीसी ॥ ३ ॥ येश्वदा ह्मणे चेटकी तुह्मी नारी ॥ मार्गी क्षणैक मुरारी ॥ एका जनार्दनीं विनवी हरी ॥ नाम घेतां पातकें पळती दुरी ॥ ४ ॥

पद २६ वें.

गोरस घेऊनि सात निघाल्या गौळणी ॥ तंव ती कृष्णाची करणी काय करी तेथें ॥ झाला पानसरा मिठी घातली पदरा ॥ आधीं दान माझें सारा मग तुह्मीं चला हो पंथें ॥ ॥ ध्रु० ॥ १ ॥ सर जाऊं दे रे सर जाऊं दे रे परता ॥ मुळीं भेटलासी चित्त ॥ नाट लागली संचिता ॥ खेपा चुक-

लिया ॥ झाला० ॥ २ ॥ अहो आसोडी पदर ॥ धरीं आणिक दुसरी ॥ येरा झोंबसी लेंकरा ॥ काय वेडा होसी ॥ झाला० ॥ ३ ॥ आह्मीं येथें अधिकारी ॥ काय केली तुमची चोरी ॥ आतां कळलिया वरी ॥ तुजमजशीं नाहीं झा० ॥ ४ ॥ आलों गेलों बहु वेळा ॥ नेणें गोरस रसाळा सर परता गोवळा ॥ काय बोलतोसी ॥ झाला० ॥ ५ ॥ का गा नदे तया नारी ॥ जें वर्म तें धरी ॥ जपावें तया अंतरीं ॥ तया हाता सांपडल्या ॥ झाला पाला वात ही न परि ती ॥ झाला० ॥ ६ ॥ हातीं गाई चुकविल्या ॥ कृष्ण मेळणी मिळाल्या ॥ राधा गौळणी ॥ झा० ॥ ७ ॥ तुका ह्मणे खंती वायां न धरावी चित्तीं ॥ होतें तुमच्या संचितीं ॥ तें हें ओढवलें आजी ॥ झाला० ॥ ८ ॥

पद २७ वें.

गोविंदारे तुझें ध्यान लागो मला ॥ ध्यान लागो मला ॥ गोपाळारे तुझें ध्यान लागो० ॥ धृ० ॥ अणुरेणु न विसंबे हरी जगत्रजिवना ॥ गो० ॥ १ ॥ सोनियाचा दिवस नाम अमृतें पाहिला ॥ नाम आठवितां रूपीं प्रगट पैं झाला ॥ गो० ॥ २ ॥ तनमन शरण विनटलों तुझ्या पायीं ॥ रखुमादेवीवरा वांचुनि आणिक नेणें कांहीं ॥ गो० ॥ ३ ॥

पद २८ वें.

गौळणी ह्मणती यशोदेला ॥ कोठें गे सांवळा ॥ कां रथ शृंगारिला सांगा हो मजला ॥ अक्रूर उभा असे बाई गे साजणी ॥ या नंदाच्या आंगणीं मिळाल्या गौळणी ॥ १ ॥ बोले नंदाची पट्टराणी सद्गदित होउनी ॥ मथुरेसी चक्रपाणी जातो गे साजणी ॥ निबळ झालें मन हें वचन ऐकुनी ॥ २ ॥ अक्रूरारे चांडाळा तुज कोणी धाडिला ॥ कां घात करूं आलासी वधिसी सर्वांला ॥ अक्रुरा तुझी नामा ऐसी करणी ॥ ३ ॥ रथीं चढला वनमाळी आकांत गोकुळीं ॥ भूमी पडल्या व्रजबाळी कोण त्या सांभाळीं ॥ नयनींच्या उदकानें भिजली धरणी ॥ ४ ॥ देव बोले अक्रूराशीं वेगें हांकी रथासी ॥ गोपिकांच्या शोकासी न पाहावें मजशीं ॥ एका जनार्दनीं ह्मणे रथ गेला निघूनी ॥ ५ ॥

पद २९ वें.

गौळणी ठकविल्या । गौळणी ठकविल्या । एकएक संगतीनें मराठी कानडिया । एक मुसलमानी । कोकणी गुजरणी । अशा पांचीजणी ॥ गौ० ॥ ध्रु० ॥ गौळणी सुंदरी गेल्या यमुनातिरीं । वस्त्रें फेडुनियां स्नान करिती नारी । गोविंदानें वस्त्रें नेलीं कळंबावरी । स्नान करूनियां त्या आल्या बाहेरी ॥ ॥ गौ० ॥ १ ॥ लडोबा गोविंदा ॥ निरवाणी आज । आडवालो

पडल्यालो ॥ शिर फोड्यानफोडी ॥ २ ॥ मारी कन्हैया मैं इज्जतकी बडी ॥ कदम पकडुंगी ॥ मैवां कुटो जुडी । मेरी लुनडी ये मेरीरे दुलडी ॥ गौ० ॥ ३ ॥ देवकीनंदना ॥ तूं एक श्रीपती ॥ उघडी हिंवाची ॥ तुज विनवुं किती ॥ पायां पडतें बा ॥ मी येतें काकुळती ॥ माझी साडी दे ॥ घे नाकाचें मोती ॥ गौ० ॥ ४ ॥ पावगा दाताला ॥ तूं नंदाचो झिलो ॥ माका फडको दी भी हिंवान मेलो ॥ घे माझो कोयतो ॥ देवा पायां पडलो ॥ ॥ गौ० ॥ ५ ॥ ज्योरे माधवजी मैं शरण थई ॥ तनका कैसी ॥ बाप दयाळ तूंही ॥ मारी साडी आपो ॥ हातनी ले कंगणी ॥ ॥ गौ० ॥ ६ ॥ इतकें ऐकूनि देव बोले हांसुनी ॥ सूर्या दंडवत करा ॥ कर जोडूनी ॥ नामा विनवितो ॥ ह्मणे सारंगपाणी ॥ गौळ्या एक तूं ॥ धन्य तुझी करणी ॥ गौ० ॥ ७ ॥

पद ३० वें.

गौळणी ह्मणती गौळणीला ॥ येश्वदेसीं पुत्र झाला ॥ १ ॥ एक धांवती एकी पुढें ॥ एक वांटिती सुंठकडे ॥ २ ॥ वाणें घेउनियां ताटीं ॥ नंदाघरीं झाली दाटी ॥ ३ ॥ ऐसी गलबल झाली ॥ दासी जनी हेल घाली ॥ ४ ॥

पद ३१ वें.

गौळण दसवंती पैं सांगे ॥ आलें कृष्णाचिये मागें ॥ येणें येणें हो श्रीरंगें ॥ नवनीत चोरिलें माझें ॥ ध्रु० ॥ तळवा तळ्हात

टेंकितो ॥ डाव्या गुडघ्यानें रांगतो ॥ गौळ्या घरचा सारंगधर ॥ तो म्यां देखिला सये ॥१॥ एक्या हातीं लोण्याचा कवळ ॥ मुख माखिलेंसे आळुमाळु ॥ चुंबन देतांचि परिमळु ॥ नवनीताचा सये ॥२॥ येणें माझें कवाड उघडिलें ॥ येणें माझें शिंकें तोडिलें ॥ दह्यादुधातें भक्षिलें ॥ लवंडिलें तक्रातें ॥३॥ ऐसें जरी मी जाणतें ॥ यमुनापाण्या नच जातें ॥ धरुनि उखळासी बांधितें ॥ शिक्षा लावितें गोविंदा ॥४॥ ऐसा पुराणप्रसिद्ध चोर ॥ केशव नाम्याचा दातार ॥ पंढरपुरीं धरिला अवतार ॥ पुंडलिकासाठीं ॥ ४ ॥

पद ३२ वें.

घे गडे राधे घे गडे कृष्णा ॥ कडेवर घे गोजिरवाणा ॥ ॥ धृ० ॥ पाळण्यांत घालुनि हालवित बसतें ॥ याचा डोळा लागेना ॥ बागुलबावाचें भय दाविता ॥ त्याच्या बोला भिईना ॥ १ ॥ दहीं वाढिलें वायां गेलें ॥ ताटिं बैसुन जेवीना ॥ राधे तुझा शब्द ऐकतां ॥ टंबकारून पाहे कान्हा ॥ २ ॥ ऊंस केळें फणस नारळ ॥ खारिक खोबरें बदाम ॥ उत्तम परिचा मेवा देतें ॥ त्याच्याकडे हा पाहिना ॥ ३ ॥ श्रीरंगेला श्रीरंगेला ॥ तुकारामाच्या भक्तिला ॥ राधे तुझें भाग्य मोठें ॥ मनरंजन वे कान्हा ॥ घे गडे० ॥ ४ ॥

पद ३३ वें.

घालूं नको रे बा धांव हरी ॥ मज नाहिं दिसत गति

आजी बरी ॥ धृ० ॥ दुःशासन उठला निरी धरूं झटला ॥ वस्त्रें पुरविलीं नानापरी ॥ मज नाहिं० ॥ १ ॥ गोकुळामध्यें देवा खेळ तूं खेळशी ॥ पांडवांचा साहाकारी ॥ मज० ॥ २ ॥ एका जनार्दनीं आसरा तुमचा ॥ ब्रीदें आपुलीं साच करीं ॥ मज नाहिं० ॥ ३ ॥

पद ३४ वें.

जात होतें पानियां तेथें भेटला सांवला ॥ दोयवल तोपी मयुल पिन्छाची खांद्यावली कांबला ॥ काय थांगुं तुतें बाई ॥ काय थांगु तुतें बाई ॥ धृ० ॥ १ ॥ घुलगे माझे फुतले ॥ मग मी ललत बतलें ॥ कुनीकुन आला सालंगपानी ॥ मला पोतासीं धालिलें ॥ काय सांगूं तुतें ॥ २ ॥ मला पोतासीं धलिलें ॥ मोतें सुख वाटलें ॥ निवलुत्तीचे कुलुपें कलुनि ज्ञानदेवा लाधलें ॥ काय थांगूं तुतें बाई ॥ ३ ॥

पद ३५ वें.

जेवीं जेवीं बा मुरारी ॥ तुज वाढितें शिदोरी ॥ कनकाचे ताटीं ॥ रत्नजडित ठेविली वाटी ॥ आमचें अन्न सारंगपाणी ॥ हिंडतसे रानोरानीं ॥ गोपाळाचे मेळीं ॥ हरि खेळे चेंडूफळी ॥ तुळसीचे वनीं ॥ उभी राहे दासी जनी ॥ १ ॥

पद ३६ वें.

तळवे तळहात टेंकितो ॥ डाव्या गुडघ्यानें रांगतो ॥

रंगणीं रंगनाथ आज म्यां देखियला सये ॥ १ ॥ यानें माझें कवाड उघडिलें ॥ यानें माझे शिंकें तोडिलें ॥ दह्या दुधातें भक्षिलें ॥ उलंडिलें ताकातें ॥२॥ एकाहातीं लोण्याचा कवळ ॥ मुखें माखला अळुमाळ ॥ चुंबन देतां येतो परिमळ ॥ नवनीताचा सये ॥ ३ ॥ गवळण दशवंती पै सांगे ॥ आलिया कृष्णाच्यानी मागें ॥ येणें यणें हो श्रीरंगें ॥ नवनीत भक्षिलें सये ॥ ४ ॥ ऐसें कांहीं मी जाणतें ॥ यमुनापाण्या जव जातें ॥ धरून खांबासीं बांधितें ॥ शिक्षा लावितें गोविंदा ॥ ५ ॥ तो हा पुराणप्रसिद्ध चोर ॥ केशवनाम्याचा दातार ॥ पंढपुरीं धरिला अवतार ॥ भक्त पुंडलिका साठीं ॥ ६ ॥

पद ३७ व.

तुझी संगत नाहीं कामाची ॥ मी सुंदर कोवळ्या मनाची ॥ मज दृष्टीनें न्याहाळितां ॥ तुज लावियली मी चर्चा ॥ कसें वेड लाविलें कान्हा गौवळिया ॥ १ ॥ तुझे आंगींची धुरट घाणी ॥ तनु काळी दिसे अमंगळ वाणी ॥ मुरली वाजवी सुखसदनीं ॥ मनमोहन कान्हया ॥ कैसें वेड० ॥ २ ॥ माझा वंश आहे थोराचा ॥ तूं तो यातीहीन गौळ्याचा ॥ ऐशी याच्या नांवरूपाचा ॥ ठावचि पुसलीया कैसें ॥ ३ ॥ तुझे ठायीं अवगुण मोठा ॥ चोरी करूनि भरसी पोटा ॥ परनारी सुंदरा चावटा ॥ हरीच अवगुणिया ॥ कैसें० ॥ ४ ॥ सर्व सुखाचा कृष्ण

संगती ॥ वेणुनादें गायगोप वेधती ॥ एका जनार्दनीं हरिरूप रमती ॥ सांवळ्या सुंदरिया ॥ कैसें० ॥ ५ ॥

पद ३८ वें.

तुझ्या मुरलीची ध्वनी ॥ आकल्पित पडली कानीं ॥ विव्हळ झालें अंतःकरणीं ॥ मी घरधंदा विसरलें ॥ १ ॥ आहारे सांवळिया कशी वाजविली मुरली ॥ धृ० ॥ मुरली नोहे केवळ बाण ॥ तिनें हरिला माझा प्राण ॥ संसार केला दाणादाण ॥ येऊनि हृदयीं संचरली ॥ २ ॥ तुझ्या मुरलीचा सुरतान ॥ मी विसरलें देहभान ॥ घर सोडोनि धरिलें रान ॥ मी वृंदावनीं गेलें ॥३॥ एका जनार्दनीं ह्मणे गोविंदा ॥ पतीत पावन परमानंदा ॥ तुझ्या नामाचा मज धंदा ॥ वृत्ति तव पदीं नित रतली ॥ ४ ॥

पद ३९ वें.

त्रिभंगीं देहुडे ठाण मांडूनीया माये ॥ कल्पद्रुम तळीये वेणू वाजवितो आहे ॥ १ ॥ गोविंदु गे माये गोविंदु गे ॥ सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमानंदु गे ॥ धृ० ॥ सावळे सगुण सकळ जिवाचे जीवन ॥ घनानंद मूर्ती पाहतां हारपलें मन ॥ २ ॥ शून्य स्थावर जंगम व्यापूनी राहीला अचळ ॥ बाप रखुमादेवीवर विठ्ठल सकळ ॥ ३ ॥

पद ४० वें.

तृण चारा चरूं विसरलीं ॥ गाई व्याघ्र एके ठायीं झालीं ॥

पक्षीकुळें निवांत राहिलीं ॥ वैरभाव समूळ विसरलीं ॥ वृंदावनीं वेणू कोणाचा ग बाई वाजे ॥ वेणू नादें गोवर्धन गाजे ॥ पुच्छ पसरूनि मयूर विराजे ॥ मजा पाहतां भासतां यादवराजे ॥ १ ॥ तेथें यमुनाजळ स्थिर वाहे ॥ रविमंडळ चालतां शब्द होय ॥ मत्स्य कूर्म वराह स्तंभित राहे ॥ बाळा स्तनपान देऊं विसरली माय ॥ २ ॥ वांकया रुण झुण रुण झुण वाजती ॥ ध्वनी मंजुळ मंजुळ उमटती ॥ देव विमानीं बैसुनि स्तुति गाती ॥ भानु दासा लागली प्रेम भक्ती ॥ ३ ॥

पद ४१ वें.

दावा प्रियकर गोविंद मला बाई ॥ कोठें गेला गे सांग लवलाही ॥ धृ० ॥ सर्व वत्सें घेउनि येईल हरी ॥ मार्ग लक्षित उभी माडीवरी ॥ पंचरत्नाची आरती करीं ॥ ओवाळुनि नेईन स्वमंदिरिं ॥ दा० ॥ १ ॥ छपर पलंगीं पुष्पाची शेज केली ॥ सभोंवार लाविल्या दिपावळी ॥ सुगंधाच्या रेखिल्या रंग वेली ॥ आझुन न ये कां निशि प्रहर झाली ॥ २ ॥ वाट पाहातां नेत्रासी आला भर ॥ काम—अग्नि पेटला अनिवार ॥ रमाधवाविण जळो हा संसार ॥ विरहशोकें मूर्च्छित शोणिवर ॥ दा० ॥ ३ ॥ शुद्ध राधेचा पाहुनियां भाव ॥ भक्त कैवारि आला देवराव ॥ उचली राधिके दिधली खत्र ॥ गोपाळात्मज मागतो चरणीं ठाव ॥ दा० ॥ ४ ॥

### पद ४२ वें.

दुडिवर दुडी गौळणी निघाल्या ॥ गौळण गोरस ह्मणों विसरल्या ॥ गोविंद घ्या कोणी दामोदर घ्यागे ॥ तंव हांसती मथुरेच्यागे ॥ १ ॥ दुडिया माझारी कान्होबा झाला भारी ॥ उचंबळे गोरस सांडे बाहेरी ॥ गो० ॥ २ ॥ एका जनार्दनीं सबरस गौळणी ॥ ब्रह्मानंद न समाये मनीं ॥ गो० ॥ ३ ॥

### पद ४३ वें.

नको वाजवूं रे कानोबा मुरली ॥ नको० ॥ धृ० ॥ तुझ्या मुरलीनें सुद बुद हरली ॥ हरलि हरली ॥ नको० ॥ १ ॥ घरीं करित होतें काम धंदा ॥ तेथेंच मी गडबडलें । नको० ॥ २ ॥ घागर घेउनि पाणियाशीं जातां ॥ डोईवर घागर पाझरली ॥ नको० ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण कृपेनें ॥ राधा गौळण घाबरली ॥ नको० ॥ ४ ॥

### पद ४४ वें.

नाहीं नाहीं मी पाहिली माती ॥ आई मज मारूं नको ॥ ॥ धृ० ॥ दहीं दूध चोरूनि दे सर्वांशीं ॥ ऐसे हे मज सांगताती ॥ १ ॥ तें न ऐकिलें ह्मणुनि मजवरी ॥ रुसले हे संगाती ॥ २ ॥ बळरामही त्यांत मिळालासे ॥ तो माझा पक्षपाती ॥ ३ ॥ दीनपणें मृदु बोलुनि हरिनें ॥ लावियेलीं नेत्रपातीं ॥ ४ ॥

पद ४५ वें.

नानापरि समजावितें परि न राहे हरी ॥ दहिं भात काल-वुनी दिला सर्वे झडकरी ॥ कडेवर घेउनियां फिरविलें मी दामोदरा ॥ राधे राधे राधे घेई श्यामसुंदरा ॥ १ ॥ क्षणभरि घरीं असतां खोडी करि सारंगपाणी ॥ बाहेर येतां आळ घेती गौळणी ॥ थोपटून निजवितें उठोनि येतो द्वारा ॥ रा० ॥ २ ॥ राधा घेउनियां हरिला गेली निज मंदिरा ॥ हृदय मंचकावरी निजविला हरी ॥ एका जनार्दनीं राधा भोगितसे सुंदरा ॥ राधे० ॥ ३ ॥

पद ४६ वें.

नको नेऊं भगवान ॥ अक्रुरा नको नेऊं भगवान ॥ धृ० ॥ वृंदावनींच्या सकळ जनांशीं ॥ दे एवढें जिवदान ॥ अ० ॥ १ ॥ मायबापही हंबर फोडीत ॥ हरणी धेनु समान ॥ अ० ॥ २ ॥ घात करूं इच्छि कंसासुर ॥ केवळ मूर्ति लहान ॥ ३ ॥ कर जोडुनि विनवी सुत ॥ कविवचनासि मान ॥ ४ ॥

पद ४७ वें.

परब्रह्म निष्काम तो हा गवळिया घरीं ॥ पायीं वांक्या अंदु कृष्ण नवनीत चोरी ॥ धृ० ॥ ह्मणती गौळणी हरीचीं पाऊलें धरा ॥ रांगत येतो हरी हा राजमंदिरा ॥ १ ॥ लपत छपत येतो हरी हा राजभुवनीं ॥ नंदासी टाकुनि आपण बसे

सिंहासनीं ॥ २ ॥ बहुता पुण्या बहुता भाग्या जोडिला देव ॥ अंत पवाडे तुमची नकळे माव ॥ ३ ॥ सांपडला देवरायासी बांधा दाव्यानीं ॥ शंखचक्र पद्मगदा सारंगपाणी ॥ ४ ॥ नामा ह्मणे अहो केशवराज दातारा ॥ जन्मोजन्मीं व्हावी तुमची चरणसेवा ॥ ५ ॥

पद ४८ वें.

पांवा वाजवी तुझा हरी ॥ यमुनेच्या तिरीं ॥ धृ० ॥ पावा वाजवी नाना छंदें ॥ सूचत नाहीं काम धंदे ॥ वेड लाविलें मुकुंदें ॥ गिरधारी गिरधारी ॥ पांवा० ॥ १ ॥ एके दिवशीं अरण्यांत ॥ पांवा वाजवी तुझा सुत ॥ आह्मीं गेलों हो धांवत॥ दोन प्रहरीं दोन प्रहरीं ॥ २ ॥ अगे सात आह्मीं गौळणी ॥ सात कृष्ण हो साजणी ॥ खेळ मांडिला हौसेनी ॥ तुझा हरी तुझा हरी ॥ पांवा० ॥ ३ ॥ खेळ मांडिला टिपऱ्यांचा ॥ परोपरी पावा वाजवी मौजेचा ॥ नाना छंदें नाचे साचा ॥ परोपरी परोपरी ॥ पावा० ॥ ४ ॥ काय सांगूं कृष्णाची मात ॥ एकाएकी झाले गुप्त ॥ बाळा निशिदिनीं हृदयीं ध्यात ॥ मुरारी मुरारी ॥ पावा० ॥ ५ ॥

पद ४९ वें.

बाई याला कोणी आणागे ॥ कोणी आणागे पंकजपाणी पियुषाची खाणी ॥ माझी विनवणी ॥ मोतियाचा दाणागे ॥

॥ १ ॥ विधि ह्मणती नेती नेती ॥ परब्रह्म परात्पर ज्योती ॥ सखेग दिनराती ॥ जिवाची विश्रांती ॥ वैकुंठींचा राणागे ॥ बाई० ॥ २ ॥ वेणु भुलला कुब्जेसीं ॥ सखे त्याविण मी परदेशी ॥ पुसा हो गौळियासी ॥ होइन तुमची दासी ॥ आणा मनमोहनागे ॥ बाई० ॥ ३ ॥ बाळ नोहे हा जगजेठी ॥ विधि जन्मला याचे पोटीं ॥ लिहिलें लल्लाटीं ॥ अक्षय्य सुख भेटी ॥ महीपती राणा गे ॥ बाई० ॥ ४ ॥

पद ५० वें.

भुलविलें राधेनें ॥ कृष्णाला ॥ भु० ॥ धृ० ॥ यशोदे तुझा कान्हा रडतां राहीना ॥ रडतो हा मोठ्यानें ॥ १ ॥ नंदाजी तुमचा कृष्ण लाडका ॥ हाका मारितो मोठ्यानें ॥ २ ॥ कडटी घेऊनी नावेंत बैसला ॥ नाहीं ऐकिलें त्यानें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण कृपेनें ॥ वागविलें देवानें ॥ ४ ॥

पद ५१ वें.

भुलविलें वेणुनादें ॥ वेणु वाजविला गोविंदें ॥ १ ॥ पांगुळलें यमुनाजळ ॥ पक्षी राहिले निश्चळ ॥ २ ॥ तृणचारा विसरलीं ॥ पुच्छ वाहोनियां ठेलीं ॥ ३ ॥ आनंद त्रिभुवनीं ॥ एका भुलला जनार्दनीं ॥ ४ ॥

पद ५२ वें.

मशीं बोलुं नको गिरधारी रे ॥ मोठा धीट बालक हरी ॥

॥ धृ० ॥ तुझे ऐकुन मंजुळ बोला चरणीं देह अर्पण केला ॥ मं० ॥ १ ॥ तुझी गोकुळीं गुजगुज उठली ॥ तुझी माझी संगत तुटली ॥ म० ॥ २ ॥ जेव्हां तेव्हांचि हा तुझा खटला ॥ तुझ्या संगतीनें जिव माझा विटला ॥ ३ ॥ कृष्णा काय करूं दैवाला ॥ कोण्या सवतीनें घात हा केला ॥ ४ ॥ बोले उद्धव चिद्घन ऐसा ॥ राधा कोंदण बोलत तैसा ॥ ५ ॥

पद ५३ वें.

मथुरेसी गोरस विकूं जाती नितंबिनी ॥ वाटे जातां भेटली राधा गौळणी ॥ निजबळें येउनियां सोडिली वेणी । सोडि सोडि कान्हा सारंगपाणी ॥ १ ॥ यानें माझ्या संसारा घातलें पाणी ॥ माझें नांव रूप दोन्हीं बुडविलीं जनीं ॥ किति याच्या खोडी मी सांगूं साजणी ॥ सोडि० ॥ २ ॥ पदरीं धरियेली राधा न सोडिच निरी ॥ भोंवताल्या गौळणी हांसती सुंदरी ॥ एका जनार्दनीं खेळे खेळे श्री मुरारी ॥ ॥ सोडि० ॥ ३ ॥

पद ५४ वें.

मनमोहन मुरलीवाला ॥ नंदाचा अलबेला ॥ धृ० ॥ विदुरा वरच्या भक्षुनि कण्या ॥ सृष्टी पालनवाला ॥ मन० ॥ १ ॥ भक्तासोठीं तो जगजेठी ॥ कुब्जेशीं रत झाला ॥ मन० ॥ २ ॥ तुका ह्मणे त्या भीमातिरीं ॥ पुंडलिकें उभा केला ॥ मन० ॥ ३ ॥

पद ५५ वें.

माझें अचडे बचडे छकुडे ग राधे रूपडे ॥ पांघरूण घालिती कुंचडे ॥ धृ० ॥ हरि माझागे सांवळा ॥ पायीं पैंजण वाजति खुळ खुळा ॥ यानें भुलविल्या गोपीबाळा ॥ मा० ॥ १ ॥ हरि माझा गे नेणता ॥ करी त्रिभुवनाचा बोंगता ॥ जो कां नांदे त्रिभुवनीं ॥ मा० ॥ २ ॥ ऐसे देवाजीचे गडी ॥ पेंद्या सुदाम्याची जोडी ॥ बळिभद्र त्याचा गडी ॥ मा० ॥ ३ ॥ जनी ह्मणे तूं चक्रपाणी ॥ खेळ खेळतो वृंदावनीं ॥ लुब्ध झाल्या त्या गौळणी ॥ माझें० ॥ ४ ॥

पद ५६ वें.

माधव, मुरली मनोहर रे ॥ धृ० ॥ श्रीवत्सलांछन हृदयीं विलसत ॥ चारीत गोधन रे ॥ १ ॥ सुरनर किन्नर नारद तुंबर ॥ ध्याती तुज निशिदिनीं रे ॥ २ ॥ एका जनार्दनीं प्रभु मनमोहन ॥ भव भय हरण रे ॥ ३ ॥

पद ५७ वें.

ह्या गौळणी मातें छळिताती फार ॥ धृ० ॥ सात पांच मिळुनि भंवताल्या माझ्या ॥ अडवुनि लाविती दार ॥ १ ॥ मग ह्मणती थोर असमी तूं जरी ॥ होता बहु बरवा विचार ॥ मज० ॥ २ ॥ माणिक प्रभु ह्मणे गौळणीसीं ॥ लीला दावी विश्वाधार ॥ मज० ॥ ३ ॥

पद ५८ वें

याच्या हातींचा वेणु कोणी घ्यागे ॥ बाई घ्यागे सई घ्यागे ॥ या० ॥ धृ० ॥ गृहीं करित होतें कामधंदा ॥ वेणु वाजविला नंदाचीया नंदा ॥ तल्लिन झालें या मुरलीच्या नादा ॥ या० ॥ १ ॥ घरिं सासुचा जाच मला भारी ॥ जावा नणंदा गांजिती परोपरी ॥ या० ॥ २ ॥ तान्हें बाळ टाकून आलें घरा ॥ घरीं सासु सासरा म्हातारा ॥ याच्या मुरलिनें जिव झाला घाबरा ॥ याच्या० ॥ ३ ॥ वेणु नोहे हं विष मला वाटे ॥ नाद ऐकतां काम मनीं दाटे ॥ मध्वनाथासीं हृदयिं मूर्ति भेटे ॥ याच्या० ॥ ४ ॥

पद ५९ वें.

यशोदेसी गौळणी सांगती गाऱ्हाणीं । नट नाटक कपटी सांभाळ आपुलीं तान्हीं । किती खोडी याच्या सांगूं साजणी. ॥ सहस्रमुख भागला । निवांत ठेला । वेद परतला । नेति नेति शब्द । वेधु लाविला गोविंदें । परमानंदें । आनंद कंदें ॥ वेधु० ॥१॥ एके दिवशीं मी गेलें यमुनातिरीं जावेना ॥ सवें गोप संगती घेऊनि आला कान्हा । करीं धरी पदरा न सोडीं जाणा । एकांतांत घाली मिठी । न सुटे गांठी । पाहिली दृष्टी । नित्य आनंदु ॥ वेधु ला० ॥ २ ॥ एके दिवशीं घरासी आले सारंगपाणी । दहीं दूध भक्षुनि रितीं केलीं दुधाणी ।

